# महाराष्ट्र शासन

<u>तात्काळ</u>

क्रमांक:सीईआर-१०११/२००४/३०,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- ०३ जानेवारी २०१२.

प्रति,

सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी.

**विषयः- <u>प्रजासत्ताक दिनाचा ६२ वा वर्धापन दिन समारंभ</u>**
**२६ जानेवारी २०१२.**

बृहन्मुंबई, विभागीय व जिल्हा मुख्यालये तसेच ग्रामीण विभाग येथे २६ जानेवारी २०१२ रोजी प्रजासत्ताक दिनानिमित्त करावयाच्या कार्यक्रमाची प्रत माहितीसाठी, मार्गदर्शनासाठी व उचित कार्यवाहीसाठी सोबत जोडली आहे.

२. सर्व विभागीय व जिल्हा मुख्यालयांच्या ठिकाणी दिनांक २६ जानेवारी २०१२ रोजी प्रजासत्ताक दिनानिमित्त करावयाचा कार्यक्रम सोबत जोडलेल्या कार्यक्रमानुसार आयोजित करण्यात यावा. नेहमीप्रमाणे विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी स्वत:च्या अध्यक्षतेखाली जिल्हा मुख्यालय येथे प्रजासत्ताक दिनाचा अशासकीय कार्यक्रम आयोजित करण्यासाठी नागरिकांच्या समित्या स्थापन कराव्यात. या समित्यांनी शैक्षणिक संस्था, कुटूंबियांचे मेळावे व व्यक्ति याद्वारे प्रजासत्ताक दिनाचा समारंभ साजरा करण्यासाठी योग्य अशी कार्यवाही करावी. ज्या कार्यक्रमांविषयी दुमत होण्याचा संभव आहे, अशांचा अंतर्भाव कोणत्याही कार्यक्रमात करण्यात येऊ नये. ज्या ठिकाणी शक्य असेल अशा सर्व ठिकाणी प्रभात फे-या आयोजित करण्यात याव्यात. दि.२६ जानेवारी, २०१२ रोजी सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन हे देशभक्तीपर व शहीदांच्या स्मृतीसाठी असावे.

३. मुंबई तसेच विभागीय व जिल्हयांच्या ठिकाणी प्रतिवर्षी प्रमाणे संचालक,सांस्कृतिक कार्य मुंबई यांचे मार्फत सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत. तथापि, सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन हे देशभक्तीपर व शहीदांच्या स्मृतीसाठी असावे.

४. **विभागीय व जिल्हा मुख्यालयांच्या ठिकाणी संबंधित पालकमंत्री राष्ट्रध्वजारोहण करतील. धुळे येथे, मा.श्री.राजेंद्र गावित, राज्यमंत्री, आदिवासी विकास, कोकण विभागीय मुख्यालय, वाशी, नवी मुंबई येथे मा.श्री.जयंत पाटील, मंत्री, ग्राम विकास यांच्याहस्ते राष्ट्रध्वजारोहण होईल. ध्वजारोहण करणारे मंत्री महोदय काही अपरिहार्य कारणामुळे कार्यक्रमस्थळी वेळेवर पोहचू न शकल्यास विभागीय मुख्यालयी, विभागीय आयुक्तांनी आणि जिल्हा मुख्यालयी जिल्हाधिकाऱ्यांनी ध्वजारोहण करावे व ध्वजवंदनाचा कार्यक्रम सुरळीतपणे पार पडेल याची दक्षता घ्यावी.** संबंधीत प्रांत अधिकारी व तहसिलदार हे जिल्हा उप विभागीय व तालुका मुख्यालये येथे ध्वजारोहण समारंभाच्या शासकीय कार्यक्रमाचे अध्यक्षस्थान स्विकारतील. मुंबईमध्ये व इतर विभागीय व जिल्हा मुख्यालयांच्या ठिकाणी पोलीस,गृहरक्षक दल, राष्ट्रीय छात्रसेना, रेल्वे सुरक्षा दल, लोक सहाय्यक सेवा व भारत स्काऊटस् आणि गाईडस् यांचे संयुक्त संचलन करण्यात यावे. संचलन आटोपल्यानंतर शहराच्या प्रमुख रस्त्यांवरुन संचलन करण्यात यावे. महाराष्ट्र राज्यामध्ये वरील दिवशी सर्व शासकीय व सार्वजनिक इमारतीवर, किल्ल्यांवर, तसेच जिल्हयामध्ये ऐतिहासिक महत्वाच्या ठिकाणी राष्ट्रध्वज उभारण्यात यावेत.

५. **दिनांक २६ जानेवारी २०१२ रोजी ध्वजारोहणाचा मुख्य शासकीय समारंभ राज्यभर एकाच वेळी म्हणजे सकाळी ०९.१५ वाजता करण्यात यावा.** जास्तीत जास्त व्यक्तींना या मुख्य शासकीय समारंभात सहभागी होता यावे यासाठी **या दिवशी सकाळी ८.३० ते १०.०० च्या दरम्यान ध्वजारोहणाचा किंवा इतर कोणताही शासकीय किंवा अर्ध शासकीय समारंभ करण्यात येऊ नये. जर एखादया कार्यालयास अथवा संस्थेला आपला स्वतःचा ध्वजारोहण समारंभ करावासा वाटल्यास त्यांनी तो समारंभ सकाळी ८.३० च्या पूर्वी किंवा १०.०० च्या नंतर करावा.**

६. **दिनांक २६ जानेवारी २०१२ रोजी मुंबई व नागपूर येथे शासकीय इमारतींवर विद्युत रोषणाई करण्यात यावी.**

७. राष्ट्रध्वजाला वंदन करताना " जन-गण-मन" हे राष्ट्रगीत वाजविले जाईल. ध्वजारोहण समारंभाचे अध्यक्षस्थान स्विकारणा-या मान्यवरांनी/अधिका-यांनी अशा प्रसंगी भाषण करावे किंवा नाही हे स्वत: ठरवावे. सलामीच्या वेळी सज्ज असलेला बॅण्ड सलामीपूर्वी व सलामीनंतर वाजविण्यास हरकत नाही.

८. राष्ट्रध्वज लावण्याच्या योग्य पध्दतीबाबत शासन परिपत्रक क्र. एफएलजी-१०९१/३० दिनांक ०२ मार्च,१९९१ तसेच क्रमांक एफएलजी-१०९१/(२)/३०, दिनांक ५ डिसेंबर, १९९१ तसेच क्रमांक एफएलजी १०९८/(ध्वजसंहिता)/३०,दिनांक ११ मार्च १९९८ अन्वये दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. **ध्वजारोहणाची रंगीत तालीम घेतली जाईल याची दक्षता घेण्याबाबत सर्व संबंधितांना सूचना द्याव्यात. राष्ट्रध्वज चांगल्या स्थितीत आहे व सूर्यास्तास उतरवला जाईल याचीही दक्षता घ्यावी.**

९. प्रजासत्ताक दिनाच्या समारंभाला सर्व शासकीय अधिकारी व कर्मचारी यांनी अगत्यपूर्वक उपस्थित रहाण्याबाबत विनंती करण्यात यावी.

१०. उत्सव अथवा औपचारीक प्रसंगी परिधान करावयाचा शासनाने ठरविलेला राष्ट्रीय पोषाख प्रजासत्ताक दिन समारंभ प्रसंगी उपस्थित राहणाऱ्या सर्व अधिका-यांनी व व्यक्तींनी परिधान करावा असा सल्ला त्यांना मंत्रालयीन विभाग, विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी व सर्व संबंधित विभाग/कार्यालय प्रमुख यांनी द्यावा.

११. खासदार, आमदार, नगर सेवक, स्वातंत्र्य सैनिक, स्थानिक राजकीय पक्षांचे प्रमुख, दलित मित्र पुरस्कार प्राप्त व्यक्ती, स्थानिक शासकीय अधिकारी आणि प्रमुख नागरिक यांना मुख्य शासकीय समारंभास उपस्थित राहण्याचे निमंत्रण द्यावे.

१२. सबंधित विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी आपापल्या अधिकारक्षेत्रात प्रजासत्ताक दिन समारंभ साजरा करण्यासंबंधी आवश्यक ती कार्यवाही कृपया करावी. त्यांच्या अधिकार क्षेत्रात त्या दिवशी समारंभाबाबत सर्व बाबी योग्य तऱ्हेने कार्यवाहीत येतील याबाबत त्यांनी व्यक्तीशः कृपया दक्षता घ्यावी.

१३. विभागीय आयुक्त,कोकण विभाग, पूणे, नागपूर, औरंगाबाद, नाशिक व अमरावती यांनी मागील पानावर दर्शविल्याप्रमाणे समारंभ वाशी, पूणे, नागपूर, औरंगाबाद, नाशिक व अमरावती येथे करण्याबाबत योग्य ती व्यवस्था सर्व संबंधितांच्या सल्लामसलतीने करावी.

१४. विभागीय आयुक्त, कोकण, पूणे, नागपूर, औरंगाबाद, नाशिक व अमरावती हे त्यांच्या मुख्यालयात ध्वजारोहण समारंभाकरिता योग्य ती व्यवस्था करणार असल्यामुळे जिल्हाधिकारी पूणे, नागपूर, औरंगाबाद, नाशिक व अमरावती येथे या संबंधी वेगळे कार्यक्रम करण्याची आवश्यकता नाही. त्याचप्रमाणे बृहन्मुंबईतील कार्यक्रमासाठी विभागीय आयुक्त, कोकण व जिल्हाधिकारी, मुंबई यांनी कार्यवाही करण्याची आवश्यकता नाही. मुंबई उपनगर जिल्हा येथे जिल्हाधिकारी ध्वजारोहणाची सर्व तयारी करतील. विभागीय आयुक्त, कोकण विभाग हे कोकण भवन येथील समारंभाची व्यवस्था करतील.

१५. माननीय राज्यपाल हे सकाळी मुंबईत प्रमुख कार्यक्रमास उपस्थित राहून ध्वजारोहण करतील.

१६. सबंधित विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी आपापल्या अधिकारक्षेत्रात प्रजासत्ताक दिन समारंभ साजरा करण्यासंबंधी आवश्यक ती कार्यवाही कृपया करावी. त्यांच्या अधिकार क्षेत्रात त्या दिवशी समारंभाबाबत सर्व बाबी योग्य तऱ्हेने कार्यवाहीत येतील याबाबत त्यांनी व्यक्तीशः कृपया दक्षता घ्यावी. तसेच देशभक्तीपर व शहीदांच्या स्मृतीसांठी सांस्कृतिक कार्यक्रम व्यवस्थितपणे आणि समाधानकारकपणे आयोजिले जात आहेत याचीही त्यांनी व सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभागाने दक्षता घ्यावी.

(सही) ३/१/१२

**(शै.वि.बिजूर)**
**सह सचिव व सह मुख्य राजशिष्टाचार अधिकारी**
सामान्य प्रशासन विभाग

---

तात्काळ

क्रमांकः सीईआर-२०११/२००४/३०,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- जानेवारी, २०१२

प्रत माहितीसाठी अग्रेषित :-

मुख्य सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव,
सर्व प्रधान सचिव/सर्व सचिव, मंत्रालयीन विभाग,
राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई (२ प्रती )
राज्यपालांचे परिवार प्रबंधक, राजभवन,मुंबई (२ प्रती )
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
विभागीय आयुक्त, कोकण विभाग,
प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (५ प्रती) ( पत्राने )
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई ( पत्राने )
प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई ( पत्राने )
प्रबंधक, उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई ( पत्राने )
प्रबंधक, लोक आयुक्त,महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय, मुंबई ( पत्राने )
फ्लॅग ऑफिसर कमांडिंग इन चीफ, वेस्टर्न नेव्हल कमांड, मुंबई,
जनरल ऑफिसर कमांडिंग, महाराष्ट्र व गुजराथ विभाग, मुंबई,
एअर ऑफिसर कमांडिंग, हेडक्वॉटर्स, मेरीटाईम एअर ऑपरेशन्स, आयएएफ,आयएएफ बिल्डींग, धोबी तलाव,मुंबई -४०० ०२०,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
स्टेशन कमांडर, इंडियन एअर फोर्स स्टेशन, मुंबई

इतर सर्व मंत्रालयीन विभाग, (मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुखांना कळविण्याच्या विनंतीसह),
केंद्र संचालक, दूरदर्शन, वरळी, मुंबई नं. ४०० ०१८,
केंद्र संचालक, आकाशवाणी, मुंबई, नागपूर ,पूणे , औरंगाबाद,
पोलीस आयुक्त, मुंबई, नागपूर ,पूणे , औरंगाबाद,ठाणे, सोलापूर, नवी मुंबई,
आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका,
महानगरपालिका आयुक्त, नागपूर ,पूणे , औरंगाबाद ,ठाणे, सोलापूर,कोल्हापूर, कल्याण- डोंबिवली, अमरावती, पिंपरी- चिंचवड, नाशिक, नवी मुंबई, उल्हासनगर, नांदेड-वाघाळा, सांगली-मिरज-कुपवाड,अकोला,
सर्व पोलीस उप महानिरीक्षक,
महासमादेशक, नागरी संरक्षण दल, मुंबई,
जिल्हाधिकारी मुंबई, उपनगर जिल्हा ,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषदा,
सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक,
महा लेखापाल-१ महाराष्ट्र, मुंबई (पत्राने),
महा लेखापाल-२ महाराष्ट्र, नागपूर (पत्राने),
अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महासंचालनालय, मुंबई,
संचालक, सांस्कृतिक कार्य, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सभापती महाराष्ट्र विधान परिषद/उपसभापती महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव,
अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा/उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव,
विरोधी पक्ष नेते विधान परिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव,
मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्यमंत्री यांचे जनसंपर्क अधिकारी, मुंबई,
उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मंत्री राजशिष्टाचार यांचे खाजगी सचिव, राज्यमंत्री,राजशिष्टाचार यांचे स्वीय सहायक,
सर्व मंत्र्यांचे आणि राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, संचालक, क्रिडा व युवक सेवा सेंट्रल बिल्डींग पूणे,
कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग,मुंबई, कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग-१, मुंबई,
कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग-२, मुंबई,
कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विद्युत विभाग/दक्षिण मुंबई विद्युत विभाग, मुंबई,
संचालक, उपवने व उद्याने, मुंबई.

२. विभागीय आयुक्त,पुणे,नागपूर,औरंगाबाद,अमरावती,नाशिक व कोकण यांना विनंती करण्यात येते की,त्यांनी पोलीस अधिकारी व नेहमी संचलनात भाग घेणा-या पथकांच्या अधिका-यांशी विचार विनिमय करुन प्रजासत्ताक दिनी मुख्यालयात संयुक्त संचलनाचा कार्यक्रम आयोजित करावा.

३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी संबंधित जिल्हाधिकारी व नेहमी संचलनात भाग घेणा-या पथकांच्या अधिका-यांशी विचारविनिमय करुन मुंबई व जिल्हा मुख्यालये येथे संयुक्त संचलनाची व्यवस्था करावी.

४. संचालक,सांस्कृतिक कार्य,महाराष्ट्र राज्य मुंबई , यांनी विभागीय ठिकाणी व जिल्हा मुख्यालये येथे नेहमीप्रमाणे देशभक्तीपर व शहीदांच्या स्मृतीसाठी सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करावे व या कार्यक्रमांना कोणत्याही करमणुकीच्या कार्यक्रमाचे स्वरुप नसावे याकरिता योग्य ती तजवीज करावी. मुंबईत दरवर्षीप्रमाणे चौपाटी,नरेपार्क,वांद्रे येथील शासकीय वसाहत या ठिकाणी त्या कार्यक्रमाचे आयोजन करावे.

3/1/12

**(शै.वि.बिजूर)**
**सह सचिव व सह मुख्य राजशिष्टाचार अधिकारी**
सामान्य प्रशासन विभाग

# प्रजासत्ताक दिनाचा कार्यक्रम, २६ जानेवारी २०१२

**बृहन्मुंबईसाठी**

| | | |
|---|---|---|
| सकाळी | ५.०० | महत्वाच्या जागी सनई चौघडा वादन |
| सकाळी | ६.३० | संघटित प्रयत्नांनी शहराच्या भागात प्रभात फे-या आयोजित करण्यात याव्यात. |
| सकाळी | ८.०० | शहराच्या सर्व भागात,सर्व इमारतीवर,शाळांवर व महाविद्यालयांवर राष्ट्रध्वज उभारणे. |
| * सकाळी | ९.१५ | ध्वजवंदन व समारंभपूर्वक संचलन. |
| * सकाळी | १०.०० | शहराच्या जास्तीत जास्त भागाचा अंतर्भाव करुन संचलन, शिक्षण विभागाच्या कक्षेत येणा-या संस्थांनी "प्रजासत्ताक महोत्सव" या पुस्तिकेंत दिल्याप्रमाणे आपले सामुदायिक कार्यक्रम आयोजित करणे तसेच इतर संस्थांनी आपले विविधतापूर्ण देशभक्तीपर व शहीदांच्या स्मृतींसाठी कार्यक्रम आयोजित करावे. व खेळांचे कार्यक्रम आयोजित करणे. |
| * संध्याकाळी | | सोयीनुसार देशभक्तीपर व शहीदांच्या स्मृतींसाठी सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करावे. |

**विभागीय व जिल्हा मुख्यालयांसाठी**

| | | |
|---|---|---|
| सकाळी | ६.३० | प्रभात फे-या |
| सकाळी | ८.०० | प्रत्येक भागातील शाळा,महाविद्यालये व इतर जास्तीत जास्त इमारतींवर राष्ट्रध्वज उभारणे |
| *सकाळी | ९.१५ | ध्वजवंदन आणि विभागीय व जिल्हा मुख्यालय किंवा ऐतिहासिक अथवा राष्ट्रीय महत्वाच्या ठिकाणी पोलीस,गृहरक्षक दल, राष्ट्रीय छात्र सेना व रेल्वे सुरक्षा दल यांचे संयुक्त संचलन |
| * सकाळी | १०.०० | शहराच्या जास्तीत जास्त भागांचा अंतर्भाव करुन पोलीस, गृहरक्षक दल,राष्ट्रीय छात्र सेना,रेल्वे सुरक्षा दल यांचे संयुक्त संचलन, शिक्षण विभागाच्या कक्षेत येणा-या संस्थांनी "प्रजासत्ताक महोत्सव" या पुस्तिकेत दिल्या प्रमाणे देशभक्तीपर व शहीदांच्या स्मृतीसाठी सामुदायिक कार्यक्रम आयोजित करणे. |
| * संध्याकाळी | | सोयीनुसार देशभक्तीपर व शहीदांच्या स्मृतींसाठी सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करावे. |

**ग्रामीण विभागांसाठी**

| | | |
|---|---|---|
| सकाळी | ६.०० | गावाची साफसफाई |
| सकाळी | ६.३० | प्रभात फे-या |
| सकाळी | ८.०० | चावडया,सार्वजनिक कार्यालये,दवाखाने,वाचनालये,शाळा, खाजगी इमारती अशा गावातील जास्तीत जास्त ठिकाणी राष्ट्रध्वज उभारणे. |
| सकाळी | ८.३० | शिक्षण विभागाच्या कक्षेत येणा-या संस्थांनी "प्रजासत्ताक महोत्सव" या पुस्तिकेत दिल्या प्रमाणे देशभक्तीपर व शहीदांच्या स्मृतींसाठी सामुदायिक कार्यक्रम आयोजित करावे. (श्रमदान) सार्वजनिक विहीरी व गावांची तळी स्वच्छ करणे, रस्त्यांची दुरुस्ती इत्यादी स्वखुशीचे कार्यक्रम. |
| संध्याकाळी | ५.०० | मिरवणुका |

---

* अशी खूण असलेले कार्यक्रम हे शासकीय समारंभ आहेत. इतर कार्यक्रम प्रजासत्ताक दिन समारंभाच्या नागरीकांच्या समितीने अशासकीय प्रातिनिधीक संस्थांच्या मदतीने, वरील दिवशी करावयाच्या कार्यक्रमाची रुपरेषा आहे.

---------